“श्री क्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर भंडारा डोंगर, नेवासा पालखीतळ/मार्ग तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत” सन २०२४-२५ मधील निधी वितरणाबाबत.

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक-तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.७१/का.१४४४-अ
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ०४ मार्च, २०२५

वाचा : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवि २०१८/प्र.क्र.०५/का.१४४४, दि. १३.११.२०१८.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०२४/प्र.क्र.३६/का.१४४४-अ, दि.०२.०७.२०२४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.७१/का.१४४४-अ, दि.०३.०९.२०२४

प्रस्तावना :

वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये “श्री क्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर भंडारा डोंगर,नेवासा पालखीतळ/मार्ग क्षेत्रातील मूलभूत सुविधा निर्माण करण्याकरीता” रु.१४२७.८५ कोटी किंमतीच्या सुधारित विकास आराखड्यास मंजुरी देण्यात आली आहे.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी सदर विकास आराखड्यास उपलब्ध झालेल्या निधीमधून विभागीय आयुक्त, पुणे यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

“श्री क्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर, पालखीतळ/मार्ग तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत” समाविष्ट असलेल्या विविध कामांकरिता सन २०२४-२५ साठी रु.४.४५ कोटी इतका निधी (रुपये चार कोटी पंचेचाळीस लाख फक्त) विभागीय आयुक्त, पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.कोटी)

| अ. क्र. | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पित निधी | यापूर्वी सन २०२४-२५ मध्ये वितरीत निधी | विभागीय आयुक्त,पुणे यांना प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| १. | ५४५२ ०१०४ ५३-मोठी बांधकामे | १९.३१ | ११.५८ | ४.४५ |

२. "श्री क्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर, पालखीतळ/मार्ग तीर्थक्षेत्र विकास आराखडयाअंतर्गत"मंजूर कामांवर होणारा सदरहू खर्च "मुख्य लेखाशीर्ष ५४५२ ०१०४, ५३- मोठी बांधकामे" याखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर प्रयोजनासाठी झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्याची कार्यवाही विभागीय आयुक्त, पुणे यांनी करावी. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागीय आयुक्त, पुणे यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.८७/२०२५/व्यय-८, दिनांक ०७.०२.२०२५ अन्वये प्रदान केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०४१११०९२१०७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2025.03.04 11:10:20 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**शासनाचे उप सचिव**

आवश्यक कार्यवाहीसाठी,

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे .
२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे.

प्रत,

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५. कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. कार्यासन (व्यय-८, अर्थ -१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४४-अ, मंत्रालय, मुंबई.